<u>राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम</u>
**मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्था, मुंबई निधी वितरण. (सन २०१५-१६)**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एनिका-२०१४/प्र.क्र.१४२/आ-५,**
जी.टी.रुग्णालय आवार, कॉप्लेक्स बिल्डींग,
नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
**तारीख: २० ऑगस्ट, २०१५**

<u>वाचा :</u>

१) **केंद्र शासनाच्या एड्स नियंत्रण विभागाचे आदेश क्रमांक : T-११०१७-A/२०१४-१५/NACO(F), दि.१०/१०/२०१४.**
२) **मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्था, मुंबई यांचे पत्र क्रमांकः मुजिएनिसं/९७८३/अ.प्र.सं., दि.२६/०२/२०१५.**
३) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. १७ एप्रिल, २०१५.**
४) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थसंकल्प-३, दि. १ ऑगस्ट, २०१५.**

<u>प्रस्तावना :</u>

राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम हा १०० टक्के केंद्र पुरस्कृत कार्यक्रम आहे. सदर कार्यक्रम बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रात मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्था, मुंबई या बृहन्मुंबई महानगरपालिका संचालित संस्थेमार्फत राबविला जातो. वित्तीय वर्ष २०१४-१५ च्या वार्षिक कृती आराखडयानुसार केंद्र शासनाने राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रमांतर्गत वरील वाचा येथील क्र.१ येथे नमुद आदेशान्वये राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेल्या रु.१३११.२२ लक्ष इतक्या निधीपैकी रु.१२४.५४ लक्ष इतका निधी मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेच्या हिश्याचा आहे. वित्तीय वर्ष २०१४-१५ संपुष्टात आल्याने व वित्तीय वर्ष २०१५-१६ च्या अर्थसंकल्पात मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेच्या (२२१० जी ००१-योजनांतर्गत) या लेखाशिर्षाखाली केवळ रु.१०००/- इतकी (टोकन) तरतूद करण्यात आल्याने वर नमुद मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेच्या हिश्याचा रु.१२४.५४ लक्ष इतका निधी वितरीत करणे शक्य झाले नाही. सन २०१५-१६ च्या वार्षिक कृती आराखडयानुसार मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेच्या (२२१० जी ००१-योजनांतर्ग) या लेखाशिर्षाखाली जुलै, २०१५ च्या पावसाळी अधिवेशनात रु.३३७८.६२ लक्ष इतक्या रकमेची पुरवणी मागणी विधानमंडळास सादर करण्यात आली होती. सदर पुरवणी मागणीस विधानमंडळाने मंजुरी दिली आहे. मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेस सन २०१५-१६ साठी पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या रु.३३७८.६२ लक्ष इतक्या तरतुदीतून वरील वाचा येथील क्र.१ येथे नमुद आदेशान्वये केंद्र शासनाने राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेल्या रु.१३११.२२ लक्ष इतक्या निधीपैकी मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेच्या हिश्शाचा रु.१२४.५४ लक्ष इतका निधी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेस राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम या योजनेवरील खर्च भागविण्यासाठी तसेच मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेंतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी वर्गाचे वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी रु.१२४.५४ लक्ष (अक्षरी रुपये एक कोटी चोवीस लक्ष चौपन्न हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे शासन मंजुरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षासाठी मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्र. आर-१**

२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०६- सार्वजनिक आरोग्य

(१०१) रोग प्रतिबंध व नियंत्रण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना

१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना

०१- रोग प्रतिबंध व नियंत्रण

(०१)(५५) राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम

(मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्था, मुंबई)

३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

(२२१० जी ००१)

राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रमांतर्गत मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेस वितरीत केलेल्या निधीचा ताळमेळ राखण्यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांना व सदर अनुदानाशी संबंधीत देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च करु नये व खर्चाचा ताळमेळ घालून अहवाल तसेच उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे..

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. ४७९/व्यय-१३, दि.११/०८/२०१५ व अर्थोपाय शाखेच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८६/अर्थोपाय/२०१५-१६, दि.१४/०८/२०१५ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२०११४६१०३५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.08.20 15:52:17 +05'30'

**( ज. सु. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. प्रकल्प संचालक, मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्था, वडाळा, मुंबई.
२. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्था, वडाळा, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग (का. १४७२), मंत्रालय, मुंबई.
१०.वित्त विभाग (अर्थसंकल्प), (व्यय-१३), (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
११.सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा), मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती (आ-५)